**मध्यावधी बदली करताना बदली कायद्यातील तरतूदींचे पालन करण्यासंदर्भात.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक, क्रमांक: एसआरव्ही-२०१४/मुस-३४/प्र.क्र.३७९/१२,**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक- ११ फेब्रुवारी, २०१५

**वाचा** :- १) सन २००६ चा महाराष्ट्र अधिनियम क्र.२१ दि.१२.०५.२००६.
२) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही २००४/प्र.क्र.१५/०४/१२ दि.२५.०५.२००६.
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही-२०१४/प्र.क्र.२६/१२, दि. ३१.१२.२०१४.
४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही-२०१४/प्र.क्र.२६/१२, दि. २०.०५.२०१४.
५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही-२०१४/प्र.क्र.२६/१२, दि. १९.०१.२०१५.

**प्रस्तावना :-**

सन २००६ चा महाराष्ट्र अधिनियम क्र.२१ दि.१२.०५.२००६. अन्वये महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ (बदल्यांचा कायदा) लागू केलेला असून सदरहू कायद्यानुसार शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या बदल्या करण्यासंदर्भात तरतुदी विहीत करण्यात आलेल्या आहेत. सदरहू कायद्याअंतर्गत शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या मध्यावधी (Midterm) बदल्या करताना बदली प्रस्तावामध्ये विशेष कारण आणि अपवादात्मक परिस्थितीसंदर्भातील स्पष्टीकरण देत नसल्याचे त्याचबरोबर अशा बदल्या करताना बदली प्राधिकाऱ्याकडून तसेच त्यांच्या वरिष्ठ प्राधिकाऱ्याकडून नियमांचे पालन होत नसल्याची बाब मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांनी मूळ अर्ज क्र.६८७/२०१४ मधील दि.०५.११.२०१४ च्या आदेशान्वये निदर्शनास आणलेली आहे. मा. न्यायाधिकरणाने बदल्यांचे आदेश निर्गमित करण्यापूर्वी बदली प्राधिकाऱ्याने काय करावे आणि काय करु नये याबाबत शासनाने प्रशासनिक संहिता तयार करण्याच्या सूचना दिलेल्या आहेत.

२. सर्वसाधारणत: बदलीचा पदावधी पूर्ण होण्यापूर्वी, मध्यावधी बदल्या करताना बदली कायद्यातील नियम ४ (४)(दोन) व नियम ४ (५) नुसार अपवादात्मक परिस्थिती किंवा विशेष कारण याबाबतचे विश्लेषण बदलीबाबतच्या नस्तीच्या टिप्पणीमध्ये /प्रस्तावामध्ये दिले गेले नसल्यामुळे तसेच असे विश्लेषण नसतानाही बदली प्राधिकाऱ्याच्या लगतचे वरिष्ठ प्राधिकारी, प्रकरणाची कोणतीही छाननी न करता व स्वत: अशा बदल्यांच्या प्रकरणांमध्ये विचारांती अंतिम निर्णय न घेता (Non application of mind) बदली प्राधिकाऱ्यांच्या, मध्यावधी बदल्यांच्या प्रस्तावास मंजूरी दिली जाते. मध्यावधी बदल्या करताना बदली कायद्यातील नियम ४ (४)(दोन) व नियम ४ (५) चे योग्यरीत्या पालन

होत नसल्यामुळे झालेल्या बदल्यांना मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणात आव्हान दिले जाते. अशा प्रकरणात बदली कायद्यातील नियम ४ (४)(दोन) व नियम ४ (५) चे योग्यरीत्या पालन न झाल्यामुळे मा. न्यायाधिकरणाकडून अशा मध्यावधी बदल्यांचे आदेश रद्द केले जातात. मध्यावधी बदल्यांसंदर्भात वारंवार दाखल होणारी प्रकरणे विचारात घेऊन मा. न्यायाधिकरणाने निरनिराळ्या न्यायालयीन प्रकरणात दिलेल्या आदेशांचा संदर्भ दिलेला असून मा. न्यायाधिकरणाने एका प्रकरणात (मूळ अर्ज क्र.७०३/२०१४ मधील दि.१६.०९.२०१४ चे आदेश) खालील निरीक्षण नोंदविलेले आहे.

**22........This Tribunal is of the view that special reason has to be referable to public interest or cognizable and compulsive personal emergency of an employee which satisfies the test of "special reason". If the transfer is merely on the request, the fact of such request seen from any angle does not satisfy the test of existence of and special reason or exceptional circumstances.**

**24 The purpose and object of the prior approval as provided as U/s 4 (5) of ROT Act 2005 is in order to have a dual check, control and the proper scrutiny in the matter of existence of the grounds based on special reasons and exceptional circumstances as reason for transfer. Said purpose is totally frustrated in present case in the background of lack of application of mind and evasive attitude of the superior officer i.e. the Respondent No. 3.**

३. मध्यावधी बदली करताना काही वेळा गैरवर्तणुकीचे कारण हे विशेष कारण किंवा अपरिहार्य परिस्थिती असल्याचे नमूद करुन शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्याची बदली केली जाते. मात्र अशी बदली करताना संबंधीत अधिकारी/कर्मचाऱ्याची खरोखरच बदली करण्याची आवश्यकता आहे किंवा कसे ही बाब तपासली जात नाही या संदर्भात मा. न्यायाधिकरणाने एका प्रकरणात (मूळ अर्ज क्र.८३९/२०१४ मधील आदेश दि.१३.१०.२०१४) खालील निरीक्षण नोंदविलेले आहे.

**35 In the result it has to be concluded that the grounds of misconduct when used as grounds for transfer, those result in a summary action which is a sort of punitive action taken in summary way. The aspects of punitiveness may get the secondary status would such lightening action, be justified, on the grounds that the transfer could safeguard the larger public interest, public safety, public order and any other similar exigency.**

**36 It is not shown by the respondents as to how the alleged misconduct of the applicant was so grave that instead of following routine legitimate course of taking disciplinary action and initiation of disciplinary proceedings against applicant, as to how or for what "special reasons" continuation of the applicant on the same post would be so gravely prejudicial to the public interest, that said need would constitute "special reasons" or "extraordinary circumstances".**

**37 If failure to transfer was about to prejudice public interest and Government records such reasons and elects transfer as quicker recourse, depending on conclusions as may emerge in judicial scrutiny, such reasons may withstand the test of existence of special reasons etc. to fit in second proviso of Section 4(4) of ROT Act 2005, lest the action would turn into a colorable exercise of powers and hence malafide.**

**38 Thus, it is evident that the version contained in the proposal for transfer i.e. letter dated 16.08.2014 alone is the factual foundation of "special reasons" or exceptional circumstances. Acts of dis-obedience picked up in a short duration, which do not prove and pose any emergency to public interest, cannot and do not ipso facto constitute factual material to answer and justify the stipulation of "special reasons" or "exceptional circumstances" either.**

४. मा. उच्च न्यायालयाने रिट पिटीशन क्र. २६६५/२०११ वरील दि.२५/०७/२०११ च्या आदेशांमध्ये खालील प्रमाणे निरीक्षण नोंदविलेले आहे.

**24........It appears that it was the case of midterm transfer treated as special case u/s 4 (5) of 2005 Act and lacunae noticed in the work of first respondent by the Secretary and remarks made by the concerned Hon'ble Minister provided sufficient reasons to Division Bench of this Court to accept it as special case. Here, as we have noticed above, the note put up for consultation and for approval before Hon'ble Minister itself is defective and does not make out any legal ground for treating it as special case.**

५. मा. उच्च न्यायालयाने व मा. न्यायाधिकरणाने नोंदविलेल्या निरीक्षणाच्या अनुषंगाने मध्यावधी बदल्या करताना मार्गदर्शक सूचना विहीत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन परिपत्रक :-**

प्रस्तावातील बाबी विचारात घेऊन मध्यावधी बदल्या करताना बदली प्राधिकारी व त्यांच्या लगतचे वरिष्ठ प्राधिकारी यांनी खालील मार्गदर्शक सूचनांचे पालन करण्याबाबत या शासन परिपत्रकान्वये आदेश देण्यात येत आहेत.

१. **बदली अधिनियमातील नियम ४ (१) मध्ये नमूद केल्यानुसार नेमणूकीचा पदावधी (३ वर्षाचा कालावधी) पूर्ण केल्याखेरीज बदली प्राधिकाऱ्याने संबंधीत शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्याची बदली प्रस्तावित करु नये.**

२. नेमणूकीचा पदावधी (३ वर्षाचा कालावधी) पूर्ण होणाऱ्या शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या **बदल्या** अधिनियमातील नियम ४ (४) मध्ये नमूद केल्यानुसार **वर्षातून केवळ एप्रिल व मे महिन्यामध्येच कराव्यात.**

३. **तीन वर्षाचा कालावधी पूर्ण नसलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्याची बदली करावयाची झाल्यास बदली प्राधिकाऱ्याने विशिष्ठ कारण नमूद करणे व त्यास त्याच्या लगतच्या वरिष्ठ प्राधिकाऱ्याची सहमती घेणे आवश्यक आहे.**

४. **एखाद्या अधिकारी/कर्मचाऱ्याने एखाद्या विशिष्ट पदाची मागणी केल्यास वा सदरहू अधिकारी/कर्मचाऱ्याने मा. लोकप्रतिनिधी मार्फत एखाद्या विशिष्ठ पदाची मागणी केल्यास व सदरहू विशिष्ट पदावर ३ वर्षापेक्षा कमी कालावधी असलेला अधिकारी/कर्मचारी कार्यरत असल्यास संबंधीत अधिकारी/कर्मचाऱ्याची बदली न करता मागणी करणाऱ्या अधिकारी/कर्मचाऱ्याची पदस्थापना अन्य पदावर करण्याची दक्षता बदली प्राधिकाऱ्याने घ्यावी.**

५. ज्या प्रकरणात एखादा अधिकारी/कर्मचारी मा. लोकप्रतिनिधींमार्फत एखाद्या विशिष्ट पदाची मागणी करीत असल्यास संबंधीत अधिकारी/कर्मचाऱ्याचे लेखी निवेदन मा. लोकप्रतिनिधींच्या पत्रासोबत जोडले आहे का याची तपासणी बदली प्राधिकाऱ्याने करावी. त्याप्रमाणे लेखी निवेदन नसल्यास संबंधीत अधिकारी/कर्मचारी यांनी मा. लोकप्रतिनिधींच्या पत्रात नमूद केल्यानुसार विशिष्ठ पदाची मागणी केली किंवा कसे ही बाब बदली प्राधिकाऱ्याने तपासून घ्यावी.

६. मनासे (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम २३ नुसार कोणताही शासकीय कर्मचारी, त्याच्या शासकीय सेवेसंबंधीच्या कोणत्याही बाबीच्या संबंधात कोणत्याही वरिष्ठ प्राधिकाऱ्यावर कोणताही राजकीय किंवा इतर बाह्य दबाव आणणार नाही किंवा तसा प्रयत्न करणार नाही, अशी तरतुद करण्यात आलेली आहे. **ज्या प्रकरणात एखादा अधिकारी/कर्मचारी मा.**

लोकप्रतिनिधींमार्फत एखाद्या विशिष्ठ पदाच्या मागणीकरीता बदली प्राधिकाऱ्यावर दबाव टाकत असल्यास सदरची तरतुद संबंधीत शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्याच्या निदर्शनास आणून द्यावी व आवश्यक असल्यास संबंधीत अधिकारी/कर्मचाऱ्याविरोधात शिस्तभंगाची कारवाई सुरु करण्यात यावी.

७. तीन वर्षापेक्षा कमी कालावधी असलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्याच्या पदावर एखाद्या अधिकारी/कर्मचाऱ्याने मागणी केल्यास वा सदरहू अधिकारी/कर्मचाऱ्याने मा. लोकप्रतिनिधी मार्फत मागणी केल्यास, ३ वर्षापेक्षा कमी कालावधी असलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्याची मध्यावधी बदली करण्यात येऊ नये. सदहू ३ वर्षापेक्षा कमी कालावधी असलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्याची माहे एप्रिल किंवा मे महिन्यातील सामान्य बदल्यांच्या कालावधीत देखील बदली करण्यात येऊ नये. तसेच ३ वर्षापेक्षा अधिक कालावधी झालेल्या अधिकारी/कर्मचाऱ्याची बदली, माहे एप्रिल किंवा मे महिन्यांव्यतिरिक्त अन्य महिन्यामध्ये विशिष्ट कारण व लगतच्या सक्षम प्राधिकाऱ्याची मान्यता घेतल्याखेरीज करु नये. केवळ ३ वर्षापेक्षा अधिक कालावधी झाला आहे या कारणास्तव माहे एप्रिल किंवा मे महिन्यांव्यतिरिक्त अन्य महिन्यामध्ये बदली करु नये.

८. एखाद्या प्रकरणात ३ वर्षापेक्षा कमी कालावधी असलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्याच्या विरोधात गैरवर्तणुकीच्या तक्रारी प्राप्त झाल्यास केवळ तक्रारीच्या आधारे संबंधीत अधिकारी/कर्मचाऱ्याची बदली करण्यात येऊ नये. अशा प्रकरणात संबंधीत अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या तक्रारीसंबंधातील वस्तुस्थिती जाणून घेऊन (आवश्यक तेथे अहवाल मागवून) तक्रारीमधील गांभीर्य विचारात घेऊन, संबंधीत अधिकारी/कर्मचारी त्याच पदावर ठेवणे आवश्यक आहे किंवा कसे याबाबत बदली प्राधिकाऱ्याने ठोस निर्णय घ्यावा. संबंधीत अधिकारी/कर्मचाऱ्याच्या विरोधातील तक्रारीमध्ये तथ्य आढळून आल्यास संबंधीत अधिकारी/कर्मचाऱ्याला त्याच पदावर ठेवून त्याच्याविरुध्द शिस्तभंगाची कारवाई सुरु करण्याबाबत बदली प्राधिकाऱ्याने निर्णय घ्यावा. मात्र संबंधीत अधिकारी/कर्मचाऱ्याला त्याच पदावर ठेवणे योग्य नाही असे बदली प्राधिकाऱ्याचे मत झाल्यास त्याबाबतची कारणामिमांसा नमूद करुन बदली प्राधिकारी संबंधीत अधिकारी/कर्मचाऱ्याची बदली त्याच्या लगतच्या वरिष्ठ प्राधिकाऱ्याकडे प्रस्तावित करु शकतो. लगतच्या वरिष्ठ प्राधिकाऱ्याकडे असा प्रस्ताव प्राप्त झाल्यास बदली प्राधिकाऱ्याने नमूद केलेली कारणे योग्य आहेत किंवा कसे याची छाननी करुन स्वत:चे मत स्पष्ट करुन बदली प्राधिकाऱ्याच्या प्रस्तावाला मान्यता द्यावी किंवा बदली प्राधिकाऱ्याचा प्रस्ताव फेटाळून लावण्यात यावा. ज्या प्रकरणात बदली प्राधिकाऱ्याच्या प्रस्तावानुसार गैरवर्तणुकीच्या अनुषंगाने शासकीय अधिकारी/कर्मचारी यांची बदली करण्यात येते अशा प्रकरणात संबंधीत अधिकारी/कर्मचारी यांची बदली केल्यानंतर त्याच्या विरुध्द शिस्तभंगाची कारवाई सुरु करण्याची दक्षता घ्यावी.

९. काही प्रकरणामध्ये एकदा सक्षम प्राधिका-याकडून बदलीचे आदेश मंजूर झाल्यानंतर अंशत: बदल असे दर्शवून वरीष्ठ प्राधिका-याची मंजूरी न घेता बदल्यांचे आदेश निर्गमित केले जातात. अशा प्रकारच्या अंशत: बदल या कारणाअंतर्गत बदल्या करण्यात येवू नयेत. काही अपवादात्मक प्रकरणी पूर्वीच्या बदली आदेशात बदल करावयाचे असल्यास तो नवीन प्रस्ताव समजण्यात येवून बदलीचा प्रस्ताव पूर्ण समर्थनासह सक्षम प्राधिका-याने त्यांच्या लगतच्या वरीष्ठ प्राधिका-याकडे सादर करुन वरीष्ठ प्राधिका-याची मान्यता घेणे बंधनकारक राहील.

१०. काही प्रकरणांमध्ये एखाद्या अधिकारी/कर्मचा-यांकडून **त्यांचा ३ वर्षाचा कालावधी पूर्ण होण्याआधीच बदली करण्याकरिता विनंती केली जाते.** अशा प्रकरणात **तो नवीन प्रस्ताव समजण्यात येवून बदलीचा प्रस्ताव पूर्ण समर्थनासह सक्षम प्राधिका-याने त्यांच्या लगतच्या वरीष्ठ प्राधिका-याकडे सादर करुन वरीष्ठ प्राधिका-याची मान्यता घेणे बंधनकारक राहील.**

११. पदोन्नतीनंतर पदस्थापना देताना विभागप्रमुख/कार्यालयप्रमुख यांनी शक्यतो रिक्त पदांवर पदस्थापना देण्याबाबत आणि ३ वर्षापेक्षा कमी सेवाकालावधी झालेल्या अधिकारी/कर्मचाऱ्याची बदली करुन त्यांच्या पदावर पदस्थापना न देण्याबाबत दक्षता घ्यावी.

१२. शासन सेवेतील गट अ, गट ब व गट क मधील अधिकारी/कर्मचा-यांच्या पदस्थापना, बदली याबाबत सक्षम प्राधिका-यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ स्थापन करण्याबाबतचे आदेश दि. ३१.०१.२०१४ च्या शासन निर्णयान्वये दिले होते. तद्नंतर सदर शासन निर्णयास पुढील आदेश होईपर्यंत दिनांक २०.०५.२०१४ च्या शासन निर्णयान्वये स्थगिती दिली होती. सदर स्थगिती आता दि. १९.०१.२०१५ च्या शासन निर्णयान्वये उठविण्यात आली असून **सर्व प्रशासकिय विभागांनी त्यांच्या अधिपत्याखालील अधिकारी/कर्मचा-यांच्या पदस्थापना व बदल्या याबाबत सक्षम प्राधिका-यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ स्थापन करणेबाबत निदेश दिलेले आहेत. सदर निदेशानुसार अधिकारी/कर्मचा-यांच्या पदस्थापना करण्यापूर्वी नागरी सेवा मंडळाच्या शिफारशी प्राप्त करुन घेण्याबाबत बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिका-याने दक्षता घ्यावी.**

१३. ज्या प्रकरणात मा. मुख्यमंत्रीमहोदय/ मा. मंत्रीमहोदय हे बदली प्राधिकारी वा लगतचे वरिष्ठ प्राधिकारी असतील अशा प्रत्येक प्रकरणात **मध्यावधी बदली करताना मा. मुख्यमंत्रीमहोदय यांना त्यांच्या प्रधान सचिव/सचिव यांनी तसेच मा. मंत्रीमहोदय यांना त्यांच्या संबंधित प्रशासकीय विभागाच्या अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव यांनी निःस्पृहपणे प्रकरणाची वस्तुस्थिती व बदली कायद्यातील तरतुदी अवगत कराव्यात.**

२. वरील सूचनांचे काटेकोरपणे पालन होईल याची सर्व बदली प्राधिकारी व त्यांच्या लगतचे वरिष्ठ प्राधिकारी यांनी कृपया दक्षता घ्यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१५०२१११६३०३४१३०७ असा आहे. हे परिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Bhagwan Sahai

Digitally signed by Bhagwan Sahai
DN: c=IN, o=All India Service, ou=IAS, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Sahai
Date: 2015.02.12 13:22:51 +05'30'

**(डॉ. भगवान सहाय)**
अपर मुख्य सचिव (सेवा), महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२) मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,

३) सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४) मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, विधानभवन, मुंबई,
५) सर्व मा. संसद सदस्य/विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य,
६) मा.मुख्य सचिव,
७) सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
८) सर्व मंत्रालयीन विभाग.
९) ग्रंथपाल , महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, सहावा मजला, विधान भवन, मुंबई ४०० ०३२ (१० प्रती)
१०) बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई १ (५ प्रती)
११) भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ. बॅरॅक नं.१ योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक, नरीमन पॉईंट, मुंबई २० (५ प्रती)
१२) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभुवन, एस. व्ही.पटेल रोड, मुंबई ४ (५ प्रती)
१३) भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस , वरळी, मुंबई १३, (५ प्रती),
१४) इंडियन नॅशनल काँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई २५ (५ प्रती)
१५) नॅशनलिस्ट काँग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, , नरीमन पॉईंट, मुंबई २१ (५ प्रती)
१६) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई २८ (५ प्रती)
१७) सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
१८) निवड नस्ती.